**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या जाहिरातीतील पदांवर शिफारशीसाठी उमेदवारांच्या मुलाखती घेण्याकरीता मंत्रालयीन विभागांकडून प्रतिनिधी नियुक्त करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक - मलोआ- ११२५/ प्र. क्र. ११४/मलोआ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक- ०४ जून, २०२५.

**वाचा:-**

१. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:-पीएससी-१०७६-१०५३-दहा, दि.०१ एप्रिल, १९७६
२. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-पीएससी-१०७६-१०५३-आठ, दि.१४ नोव्हेंबर, १९७९
३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-पीएससी-१०८१-१७०३-सीअेन-१५९-आठ, दि.०७ नोव्हेंबर, १९८१
४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-मलोआ-१०८९-८६५-आठ, दि.४ मे,१९८९
५. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-मलोआ-१०९२-१९५५/प्र.क्र.६२/आठ, दि.१६ ऑक्टोबर, १९९२

**परिपत्रक**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगातर्फे घेण्यात येणाऱ्या मुलाखतींच्या वेळी, संबंधित पदाच्या कामकाजाच्या अनुषंगाने अथवा प्रशासनिक कामकाजाच्या ज्ञानासंदर्भात काही प्रश्न विचारणे आवश्यक असते. यास्तव मुलाखतीसाठी शासनाचा प्रतिनिधी म्हणून वरिष्ठ अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात येते.

यास्तव संदर्भाधीन परिपत्रकांद्वारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगातर्फे घेण्यात येणाऱ्या मुलाखतींच्या वेळी शासकीय प्रतिनिधी म्हणून कोणाची नियुक्ती करावी याबाबत वेळोवेळी आदेश निर्गमित केले होते. सदर सर्व आदेश अधिक्रमित करण्यात येत असून खालीलप्रमाणे सुधारित सूचना सदर परिपत्रकाद्वारे निर्गमित करण्यात येत आहेत.

क्षेत्रिय कार्यालयातील ज्या संवर्गातील पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने जाहिरात प्रसिध्द केली आहे, ते क्षेत्रिय कार्यालय ज्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखाली आहे त्या विभागातील सह सचिव किंवा उप सचिव किंवा संबंधित क्षेत्रिय कार्यालयातील सह/उप सचिव दर्जाचा अधिकारी यांना मुलाखतीसाठी सदस्य म्हणून पाठविण्यात यावे अशा सूचना या परिपत्रकाद्वारे देण्यात येत आहेत.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६०४१२५२४५२००७ असा आहे. सदर परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GEETA RAHUL KULKARNI

Digitally signed by GEETA RAHUL KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=87e2e317e0d978442ac6b599d6a0abcf73fe717ee52994443a8509075101cc93, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92D474843B842720200D1A10946D5FC9348B9450F867605A47D177207C9BD384, cn=GEETA RAHUL KULKARNI
Date: 2025.06.04 12:54:01 +05'30'

**(गीता कुलकर्णी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
३. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालये
४. निवडनस्ती / सा.प्र.वि. मलोआ